वरिष्ठ भूवैज्ञानिक व सहायक भूवैज्ञानिक संवर्गांच्या दिनांक ०१.०१.२०२२ च्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या प्रसिध्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: ज्येष्ठता-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/आ (वर्ग-२)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ०९ फेब्रुवारी, २०२२

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/कार्या-१२, दिनांक १३.०७.२०२१.

२) जलसंपदा विभाग,शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठता-२०२१/प्र.क्र.२६६/२०२१/आ(वर्ग-२), दिनांक १०.१२.२०२१

**-: परिपत्रक :-**

जलसंपदा विभागातील वरिष्ठ भूवैज्ञानिक व सहायक भूवैज्ञानिक संवर्गांच्या दिनांक ०१.०१.२०२१ च्या अंतिम ज्येष्ठतासूच्या संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आल्या आहेत. आता, या संवर्गांच्या दिनांक ०१.०१.२०२२ च्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सुचनांनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून सोबत जोडलेल्या परिशिष्ट- अ व परिशिष्ट- ब अन्वये प्रसिध्द करण्यात येत आहेत.

२. सदरहू तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या तयार करताना मुख्यत्वेकरून महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदींचा अवलंब करण्यात आला आहे.

३. सदर तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या या मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल व प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहेत.

३. अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक व अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे यांनी सदर ज्येष्ठतासूच्या सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक व सहायक भूवैज्ञानिक (रजेवर/प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिकाऱ्यांसह) यांच्या निदर्शनास आणाव्यात. तसेच सदर ज्येष्ठतासूच्यांमध्ये काही वास्तविक चुका/त्रुटी आढळल्यास त्या, हे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या आत लेखी स्वरुपात विहीत मार्गाने शासनाच्या निदर्शनास न आणल्यास त्याबाबत आपले काही आक्षेप नाहीत, असे समजून वरिष्ठ भूवैज्ञानिक व सहायक भूवैज्ञानिक संवर्गांच्या उक्त तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या अंतिम करण्यात येतील.

४. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०२०९१५३३२८०४२७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

BAPUSAHEB R SONAWANE

Digitally signed by BAPUSAHEB R SONAWANE
DN: CN = BAPUSAHEB R SONAWANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.02.09 15:36:52 +05'30'

**(बा.रा.सोनवणे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत-परिशिष्ट-अ व ब**

**प्रत-**

१. सचिव (लाक्षेवि)/सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे)
३. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक
४. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव (प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मुख्य अभियंते तथा सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक
८. अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे
९. कार्यासने:- आ(वर्ग-१)/आ(संनि)/गोपनीय शाखा, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. आ(वर्ग-२) कार्यासन संग्रहार्थ.

## परिशिष्ट-अ

वरिष्ठ भूवैज्ञानिक,गट-अ संवर्गाची दिनांक ०१.०१.२०२२ ची तात्पुरती ज्येष्ठतासूची

वेतनश्रेणी : S-२० : ५६१००-१७७५००

| ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव | नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक | प्रवर्ग | पदोन्नती / नियुक्ती आदेशाचा दिनांक | ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्री. सुनिल रामचंद्र जाधव | पदोन्नती | २२/०६/१९६४ | अ.जा. | २५/०५/२०१५ | २५/०५/२०१५ | ३०/०६/२०२२ | एम.एस.सी. (भूशास्त्र) | |

## परिशिष्ट-ब

सहायक भूवैज्ञानिक,गट-ब संवर्गाची दिनांक ०१.०१.२०२२ ची तात्पुरती ज्येष्ठतासूची

वेतनश्रेणी : S-१५ : ४१८००-१३२३००

| ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नांव | नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक | जात प्रवर्ग | पदोन्नती / नियुक्ती आदेशाचा दिनांक | ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्री. सुधीर रामराव साले | पदोन्नती | ०१/०२/१९६५ | खुला | १०/०४/२०१२ | १०/०४/२०१२ | ३१/०१/२०२३ | बी.एस.सी. (भूशास्त्र) | |